**केंद्र पुरस्कृत पी. एम जनमन या कार्यक्रमासाठी अनुसूचित जमाती उपयोजनेचा (TSP) पहिल्या हप्त्याचा निधी वितरित करणेबाबत (केंद्र हिस्सा).**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- समग्र २०२४/प्र.क्र. ३४/ एसडी-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक: २७ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) वित्त विभागाचे क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३ व दि. ०८.१२.२०२३ चे परिपत्रक
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र. बीयुडी २०२४/ प्र.क्र. ५०/ कार्यासन-६, दि.१३.०३.२०२४.
३) केंद्र शासन, शिक्षण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे आदेश क्र १०-६६/२०२३ IS -१५ दि. १२.२.२०२४
४) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे दि.२८.२.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये पी. एम जनमन या योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. सन २०२३-२०२४ च्या केंद्रीय अर्थसंकल्पामध्ये आदिम जमातीच्या (Particularly Vulnerable Tribal Groups (PVTGS)) उन्नतीसाठी प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (PM JANMAN) या योजनेची घोषणा करण्यात आलेली होती. केंद्रीय मंत्रिमंडळाने या योजनेत मंजूरी दिलेली असून, याबाबतची घोषणा मा. पतप्रधान महोदयांनी भगवान बिरसा मुंडा यांच्या झारखंड या राज्यामधील खुट्टी या जन्मगावी दि.१५ नोव्हेंबर, २०२३ रोजी जनजाती गौरव दिवसाचे औचित्य साधून केलेली आहे. या योजनेमध्ये राज्यातील ११ जिल्ह्यामधील (चंद्रपूर, नांदेड, नाशिक, पालघर, पुणे, रायगड, रत्नागिरी, सातारा, सिंधुदुर्ग, ठाणे, यवतमाळ) कातकरी, कोलाम व माडींया गोंड या आदिम जमातीचा समावेश आहे. या आदिम जमातीमधील विद्यार्थ्यांना नियमित शिक्षणाची सोय उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने निवासी वसतीगृह तसेच व्यावसायिक शिक्षण आणि कौशल्य विकासासाठीच्या सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी विचारात घेऊन तसा आराखडा तयार करून केंद्र शासनास राज्य प्रकल्प संचालक यांनी दि. २८.१२.२०२३ रोजी सादर केलेला आहे. या योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण (केंद्र: राज्य) ६०:४० असे आहे.

३. केंद्र शासनाने संदर्भ क्र. ३, दिनांक १२.२.२०२४ रोजीच्या आदेशान्वये या योजनेसाठी समग्र शिक्षा या योजनेच्या अनुसूचित जमाती (TSP) उपयोजनेखाली केंद्र हिस्सा रू. २४०.०० लक्ष इतका निधी मंजूर केला आहे. वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने केंद्र हिस्सा निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीत जमा झाल्याबाबत ई-मेलद्वारे कळविले आहे. पी.एम जनमन या योजनेसाठी स्वतंत्र लेखाशिर्ष घेण्याची कार्यवाही सुरू आहे. सबब, पी. एम जनमन या योजनेचा प्राप्त झालेला निधी समग्र शिक्षा या योजनेच्या अनुसूचित जमाती (TSP) उपयोजनेसाठीच्या लेखाशिर्षामधून वितरित करण्यात येत आहे.

४. समग्र शिक्षा योजनेच्या अनुसूचित जमाती (TSP) उपयोजनेसाठी "मागणी क्रमांक टी-५, (२२०२ आय ६५७) (राज्य हिस्सा ४० टक्के) या लेखाशिर्षाखाली पुरेशी तरतुद शिल्लक नसल्याने केवळ केंद्र शासनाने वितरीत केलेला निधी समग्र शिक्षा या योजनेच्या अनुसूचित जमाती (TSP) उपयोजनेसाठी "मागणी क्रमांक टी-५, (२२०२ आय ६४८) (केंद्र हिस्सा ६० टक्के) या लेखाशिर्षाखाली रू. २४०.०० लक्ष इतका निधी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने उपरोक्त प्रमाणे उपलब्ध करुन दिलेला निधी खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्याकडे पी. एम जनमन या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी या आदेशान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर विवरणपत्रातील स्तंभ क्र. ४ येथील वितरीत करावयाची तरतूद स्तंभ क्र. २ येथील लेखाशिर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

| अ. क्र. | लेखाशिर्ष | सन २०२३-२४ साठी मंजूर तरतुद | वितरित करावयाची तरतुद |
|---|---|---|---|
| १ | २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) (१०) समग्र शिक्षा अभियान (केंद्र हिस्सा ६० टक्के) (२२०२ आय ६४८), ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) | रू. २०९४६.६५ लक्ष | २४०.०० लक्ष |
| | एकुण | | २४०.०० लक्ष |

२. वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दि. १२.०४.२०२३ मधील नमूद केलेल्या सर्व बाबींची पूर्तता होत आहे. सदर अनुदान सशर्त अनुदान असुन यापुर्वी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. या अनुदानाच्या अटी व शर्ती सदर शासन निर्णयात नमुद केल्या आहेत.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाचे दि. १२.२.२०२४ रोजीच्या आदेशामध्ये दिलेल्या निदेशानुसार व सन २०२३-२४ च्या वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रक प्रकल्प मान्यता मंडळाने (PAB) मंजूर केलेल्या समग्र शिक्षा योजनेच्या चालू योजनांच्या आवर्ती/अनावर्ती बाबीसाठी खर्च करावा.

४. खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

५. प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (PM JANMAN) या योजनेचा खर्च हा Single Nodal Account (SNA) खात्यातून करण्यात यावा. अनुसूचित जमाती या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय / उप लेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ. माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास विभाग व शालेय शिक्षण विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

६. आदिवासी उपयोजन क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

७. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजन क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजन बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तीक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

८. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. १२.०४.२०२३ चे परिपत्रकामधील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव/ कक्ष अधिकारी (रोख/लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर सह/उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरित करुन निधी समग्र शिक्षा यांच्या बँक खात्यात जमा करावा.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे संदर्भाधिन दि.१२.०४.२०२३ चे परिपत्रक व दि.०८.१२.२०२३ चे परिपत्रक आणि आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय, दि. १३.३.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२७१४५३११९७२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.03.27 15:02:55 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर
८. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-६३
९. सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
१०. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई

११. उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. वित्त विभाग, (व्यय-५/अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१३. अवर सचिव/कक्ष अधिकारी, लेखाशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४ . अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय , मुंबई.
१५. निवड नस्ती (एसडी-१).